महिला व बाल विकास विभागातील गट-अ या संवर्गातील पदांचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: मबाआ २०१८/ प्र.क्र.१६६/कार्या-७**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक: ०७ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :-** १) महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन), नियम, १९८१

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेतन १३११/प्र.क्र.१७/ सेवा-३, दिनांक २७ डिसेंबर, २०११

३) शासन शुध्दीपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेतन-१३११/ प्र.क्र.१७/सेवा-३ दि.१ जून, २०१५

४) शासन शुध्दीपत्रक महिला व बाल विकास विभाग क्रमांक, मबाआ २०१६/प्र.क्र.६/का-७ दि. ३० जानेवारी, २०१६

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही २०१८/ प्र.क्र.२०८/कार्या-१२ दिनांक ०५ सप्टेंबर, २०१८

६) शासन परिपत्रक, महिला व बाल विकास विभाग क्रमांक, मबाआ २०१८/प्र.क्र.१६६/का-७ दि. १ जून, २०१९

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र.५ येथील दि. ०५ सप्टेंबर, २०१८ च्या शासन परिपत्रकान्वये अतिरिक्त कार्यभार सोपविताना विचारात घ्यावयाच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. महिला व बाल विकास विभागातील आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, आयुक्तालय, पुणे व एकात्मिक बाल विकास सेवा योजना, आयुक्तालय, नवी मुंबई यांच्या अधिनस्त येथिल गट-अ या संवर्गातील बहुसंख्य पदे रिक्त आहेत. सदर पदे सरळसेवेने/ पदोन्नतीने/ प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत विभागामार्फत कार्यवाही सुरू आहे. तथापि, एकंदरित महिला व बाल विकास विभागात गट-अ संवर्गातील बहुसंख्य पदे ही बऱ्याच कालावधीकरिता रिक्त राहणार आहे. आता या विभागाकडील गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या रिक्त पदांची वाढलेली संख्या, रिक्त पदे भरण्यास विभागास लागणारा कालावधी याचा विचार करून गट-अ संवर्गातील रिक्त पदांचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्याबाबत संदर्भाधिन क्र. ६ येथिल परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

तथापि, बदली, सेवानिवृत्ती, निलंबन इ. कारणांमुळे रिक्त झालेल्या पदावर तात्पुरत्या व्यवस्थेच्या स्वरुपात कमाल १५ दिवसाच्या कालावधीसाठी अतिरिक्त कार्यभार प्रकरण परत्वे संबंधित आयुक्तांना त्यांच्या स्तरावरून देता येईल आणि १५ दिवसाच्या कालावधीनंतर तात्पुरत्या व्यवस्थेतंर्गत दिलेला अतिरिक्त कार्यभार आपोआप संपुष्ठात येईल अशी तरतुद असतानाही १५ दिवसाच्या कालावधीनंतर नियमित अतिरिक्त कार्यभार सोपविण्याबाबतचे प्रस्ताव विहीत कालावधीत शासनास सादर होत नसल्यामुळे प्रशासकीय कामकाजात संभ्रम/ अडचणी निर्माण होत आहेत. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या सर्व संबंधित शासन निर्णय/ परिपत्रके यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची जबाबदारी ही संबंधित प्रशासकीय विभागाच्या अधिनस्त असलेल्या सर्व कार्यालयांची आहे. तद्अनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त दि. ०५ सप्टेंबर, २०१८ च्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनाची अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भाधिन क्र. ६ येथिल दि. १ जून, २०१९ चे परिपत्रक अधिक्रमित करून सुधारित आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन परिपत्रकः-</u>**

सामान्य प्रशासन विभागाच्या सर्व संबंधित शासन निर्णय/ परिपत्रके यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित प्रशासकीय विभागांची तसेच प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांची आहे. त्यामुळे महिला व बाल विकास विभागांतर्गत गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांना रिक्त पदांचे अतिरिक्त कार्यभार सोपविण्याबाबत यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले सर्व शासन निर्णय, आदेश, परिपत्रके अधिक्रमित करण्यात येत असून पुढीलप्रमाणे कार्यपध्दती विहीत करण्यात येत आहे:-

१) महिला व बाल विकास विभाग, आयुक्तालय, पुणे व एकात्मिक बाल विकास सेवा योजना, आयुक्तालय, नवी मुंबई यांनी सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधिन दि. ०५ सप्टेंबर, २०१८ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून त्यांच्या अधिनस्त गट-अ संवर्गातील पद रिक्त झाल्यानंतर रिक्त पदाचा अतिरिक्त कार्यभार देण्यासंबंधी तपशिल आवश्यक त्या सर्व माहितीसह तातडीने शासनास सादर करावा.

२) सदर तपशिल सादर करताना विभागीय चौकशी सुरु असलेल्या अधिकाऱ्यास अतिरिक्त कार्यभार दिल्यामुळे त्याच्या स्वत:च्या विभागीय चौकशीवर प्रभाव पडण्याची वा विभागीय चौकशीमध्ये अडथळा आणण्याची शक्यता असल्यास, अशा अधिकाऱ्यांस अतिरिक्त कार्यभार प्रस्तावित करण्यात येऊ नये.

३) यापुढे सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०५ सप्टेंबर, २०१८ च्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनास अनुसरून अतिरिक्त कार्यभार देण्याबाबतचे आदेश प्रशासकीय विभागाच्या स्तरावरून निर्गमित करण्यात येतील.

५) वरील प्रमाणे सादर केलेल्या माहितीवर विचार करून गट-अ संवर्गातील रिक्त पदाचा अतिरिक्त कार्यभार देण्याबाबतची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०५ सप्टेंबर, २०१८ च्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनानुसार या आदेशानंतर पूर्णत: प्रशासकीय विभाग स्तरावरून करण्यात येईल. <u>यानंतर **अतिरिक्त कार्यभार देण्याबाबतचे कोणतेही आदेश प्रशासकीय विभागाच्या मान्यतेशिवाय आयुक्तालय स्तरावरून निर्गमित करण्यात येवू नयेत**</u> व सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०५ सप्टेंबर, २०१८ च्या शासन परिपत्रकातील तरतुदींचे उल्लघन होणार नाही यांची दक्षता घेण्यात यावी. प्रशासकीय कामाची निकड/अडचणी व रिक्त पदे विचारात घेता, अतिरिक्त कार्यभार देण्याबाबत प्रकरणपरत्वे दोन्ही आयुक्तालयानी, अतिरिक्त कार्यभाराने रिक्त पदे भरण्याबाबत शासनाकडे पाठपूरावा करून मान्यता घेणे बंधनकारक राहिल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९११०७१३१५०१२९३० असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

सदर सूचना तात्काळ अंमलात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.11.13 11:43:45 +05'30'

( ला. रा. गुजर )
शासनाचे सह सचिव

**प्रत:-**

१. आयुक्त,महिला व बाल विकास, आयुक्तालय, पुणे.

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
४. सर्व विभागीय उपायुक्त,महिला व बाल विकास विभाग
५. कोषागार अधिकारी (सर्व जिल्हे )
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / नागपूर
७. सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
८. सह सचिव महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
९. कक्ष अधिकारी, (कार्यासन-७ अ )महिला व बाल विकास
१०. निवड नस्ती (कार्यासन-७ ).